**सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील अधिकारी व जवान यांच्या विधवा/अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त झालेल्या अधिकारी/जवानांना आर्थिक मदत देण्याबाबत.**

# *महाराष्ट्र शासन*

*सामान्य प्रशासन विभाग*

शासन निर्णय, क्रमांकःमासैम-२००९/३५४/(प्र.क्र.८१ /२००९)/२८

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- **२० जून, २००९.**

***वाचा :-*** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम-१०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२८, दिनांक ४ ऑक्टोबर २०००,
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैक-२००२/९३३/प्र.क्र.८६/२००२/२८, दिनांक ९ डिसेंबर, २००३,
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम-२००९/३५४/प्र.क्र.८१/२००९/२८, दिनांक ०७ मे, २००९ व दिनांक ०५ जून, २००९.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन अ.क्र.(१) व (२) येथील शासन निर्णयाद्वारे जम्मू-काश्मिर मधील नियंत्रण रेषेजवळील क्षेत्रात तसेच देशातंर्गत भागात मे, १९९९ पासून निर्माण झालेल्या युध्दजन्य तणावाच्या परिस्थितीत चकमकीत/मोहिमेअंतर्गत धारातीर्थी पडलेल्या सैन्यदलातील महाराष्ट्र राज्यातील सैनिकांच्या विधवांना/अवलंबितांना प्रत्येकी रु.५.०० लाख प्रमाणे एकवेळची आर्थिक मदत देण्याबाबत त्याचप्रमाणे गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व आलेल्यांना त्यांच्या अपंगत्वाच्या प्रमाणानुसार रु.१.०० व रु.३.०० लाख आर्थिक मदत देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. या आर्थिक मदतीपैकी संदर्भाधीन अ.क्र.(१) व (२) येथील शासन निर्णय दि.४.१०.२००० व दि.१३.३.२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे द्यावयाच्या आर्थिक मदतीपैकी ४०% रक्कम शासकीय अनुदानातून व उर्वरित ६०% रक्कम मुख्यमंत्री सहाय्यता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत गुंतविण्यात आलेल्या रु.२२.२२ कोटी इतक्या रक्कमेच्या व्याजातून देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्र.१ व २ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयांनुसार युध्दात/चकमकीत धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या अवलंबितानां आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. :-

अ) धारातीर्थी पडलेले जवान (रुपये ५.०० लाख प्रमाणे एक वेळची आर्थिक मदत) -

| अ. क्र. | नाव | मृत्यू दिनांक/मोहिम | वारसाचे नाव व आर्थिक मदतीची रक्कम |
|---|---|---|---|
| **१** | **कै. यादव जालिंदर शंकर, १०१५०१३७ पी, १०९ इन्फैन्ट्री बटालीयन (टी ए) मराठा एल आई, हवालदार** | **११.१०.२००८ कॉऊटर इन्सरजेन्सी ऑपरेशन, श्रीनगर (जम्मू-काश्मिर)** | **श्रीमती सुरेखा जालिंदर यादव (वीरपत्नी) - रुपये ५.०० लाख मु.पो.पाडळी, ता.तासगांव, जिल्हा सांगली.** |
| **२** | **कै.पगार पंढरीनाथ भास्कर, जी-५००२४४७, ६ आसाम रायफल्स, रायफलमॅन/जीडी** | **०१.०५.२००८ कॉऊटर इन्सरजेन्सी ऑपरेशन (मणिपूर)** | **१. सौ.विमल भास्कर पगार (वीरमाता) - रुपये २.५० लाख<br>२. श्री.भास्कर रामभाऊ पगार (वीरपिता) - रुपये २.५० लाख<br>मु.पो.खडक ओझर, ता.चांदवाड, जिल्हा नाशिक** |

४. वरील धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या अवलंबितास द्यावयाची आर्थिक मदत रु.१०,००,०००/- (रुपये दहा लाख फक्त) इतक्या रक्कमेपैकी ४०% रक्कम रु.४,००,०००/- (रुपये चार लाख फक्त) शासकीय अनुदानातून तर उर्वरीत ६०% रक्कम रु.६,००,०००/- (रुपये सहा लाख फक्त) मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत गुंतविण्यात आलेल्या रु.२२.२२ कोटी रक्कमेच्या व्याजातून देण्यात यावी.

**५.** वरील परिच्छेद क्र.२ मध्दे नमूद केल्याप्रमाणे शासन अनुदानामधून द्यावयाच्या रक्कमेपोटी होणारा रु.४,००,०००/- (रुपये चार लाख फक्त) इतका खर्च मागणी क्र.ए-५, लेखाशीर्ष "२२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम - १०२-सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतन - (००) (०४) देशांतर्गत सुरक्षासंबंधी मोहिमेत चकमकीत/धारातीर्थी पडलेल्या सैन्यातील जवानांच्या विधवांना/अवलंबिताना आर्थिक मदत (२२३५-२६०-८)" याखाली सन २००९-२०१० या आर्थिक वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. **तसेच शहीद जवांनाच्या कुंटुंबियांना द्यावयाची आर्थिक मदत संबंधित जिल्ह्याच्या मा. पालक मंत्र्यांच्या हस्ते देण्यात यावी.**

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. **२००९०६२०१११०२७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

**( अ. द. जोशी )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.मंत्री (मासैक),
मा.राज्यमंत्री (मासैक),
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई, (शाखा -ड-५/ड-६) २० प्रती
महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर,
कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई - ४०० ००५,
जिल्हाधिकारी, सांगली, नाशिक,
जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे,
संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे - ४११००६, (५ प्रती)
जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, सांगली, नाशिक,
सह संचालक, लेखा व कोषागार,संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन,मुंबई - ३२,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
वित्त विभाग (व्यय-४,) मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
सामान्य प्रशासन विभाग/कार्या-२५,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती (२ प्रती).